महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक: आरटीआर-१४०३/८४/प्र.क्र.५४/०३/१३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १० मे, २००५

वाचा:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.आरटीआर-१०८५/८५३/प्र.क्र.७२/८५/१३, दि. १५-४-१९९१
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-१०९४/प्र.क्र.४/ ९४/१२, दि. ७-३-१९९६
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीसीसी-१०९७/प्र.क्र.६३/ ९७/१६ब, दि. १८-१०-१९९७

**प्रस्तावना**

उपरोक्त अनुक्रमांक १ येथे नमूद केलेल्या दिनांक १५/४/१९९१ च्या शासन निर्णयान्वये गट "ड" मधील कर्मचाऱ्यांना गट "क" मधील लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नती देण्यासंदर्भात काही अटी व शर्ती विहित केलेल्या आहेत. त्यामधील एक अट अशी आहे की, सदर शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता होत असल्यास त्या त्या विभागात /कार्यालयात त्या त्या विशिष्ट वर्षी रिक्त झालेल्या लिपिक-टंकलेखक पदाच्या २५ टक्के पदांवर पदोन्नती द्यावी. तथापि, उपरोक्त अनुक्रमांक २ येथे नमूद केलेल्या दिनांक ७ मार्च, १९९६ च्या शासन निर्णयान्वये सेवाभरतीचे प्रमाण निश्चित करताना हे प्रमाण त्या त्या संवर्गातील कायम (Permanent) आणि हंगामी (Temporary) अशा दोन्ही स्वरूपांच्या एकूण मंजूर पदांच्या पदसंख्येला लावण्याबाबत आदेशित केले आहे. यास्तव दिनांक १५/४/१९९१ च्या आदेशातील विशिष्ट वर्षी रिक्त झालेल्या लिपिक-टंकलेखक पदाच्या २५ टक्के पदांवर पदोन्नती देण्याची तरतूद उपरोक्त क्रमांक २ येथील दिनांक ७ मार्च, १९९६ च्या शासन निर्णयान्वये अधिक्रमित झाली आहे.

त्याचप्रमाणे अनुक्रमांक ३ येथे नमूद केलेल्या दिनांक १८ ऑक्टोबर, १९९७ च्या शासन निर्णयातील आरक्षणविषयक तरतुदी गट "ड" मधील पात्र कर्मचाऱ्यांना गट "क" मधील लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नती देताना लागू करावयाच्या आहेत. कमी संवर्ग संख्या असलेल्या कार्यालयातील गट "ड" च्या कर्मचाऱ्यांना गट "क" मध्ये पदोन्नती मिळण्यासंदर्भात कोटा निश्चित करणे तसेच गट "ड" मधून गट "क" मध्ये पदोन्नती देण्यासाठी संगणक ज्ञानाची अर्हता आवश्यक करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

वरील सर्व बाबी विचारात घेऊन गट "ड" मधील पात्र कर्मचाऱ्यांना गट "क" मधील लिपिक-टंकलेखक या पदावर पदोन्नती देण्याबाबतच्या दिनांक १५/४/१९९१ च्या आदेशामध्ये अंशत: बदल करून आता पुढीलप्रमाणे सुधारणा करण्याचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

१) गट "ड" मधील पात्र कर्मचाऱ्यांना गट "क" मधील लिपिक-टंकलेखक या पदावर पदोन्नती देताना प्रतिवर्षी रिक्त होणाऱ्या पदांच्या २५ टक्के पदांऐवजी लिपिक-टंकलेखक संवर्ग संख्येच्या एकूण मंजूर पदसंख्येच्या २५ टक्के पदांवर पदोन्नती देण्यात यावी.

मात्र असे करताना ज्या कार्यालयात लिपिकवर्गीयांची पदे ४ पेक्षा कमी आहेत त्या कार्यालयाकरीता पुढील सूत्राचा अवलंब करावा.

कृ.मा.प.

| लिपिकवर्गीय पदांची संख्या | गट "ड" मधील पदोन्नतीसाठी नियत करावयाची कमाल पदे |
|---|---|
| १ | ० |
| २ | १ |
| ३ | १ |

या सूत्रामुळे लिपिकवर्गीय पदे ४ पेक्षा कमी असल्यास २५ टक्क्यांची मर्यादा त्या त्या प्रमाणात शिथिल केल्याचे समजण्यात यावे.

२) गट "ड" मधील कर्मचारी गट "क" मध्ये पदोन्नत होण्यापूर्वी जर त्याने संगणकाची अर्हता प्राप्त केली नसेल तर गट "क" मधील पदावरील नियुक्तीपासून २ वर्षांच्या काळात विहित संगणक ज्ञानाची अर्हता त्यास प्राप्त करावी लागेल. अन्यथः त्याला गट "ड" मधील पदावर पदावनत व्हावे लागेल.

३) संदर्भाधीन क्रमांक ३ येथे नमूद केलेल्या दिनांक १८/१०/१९९७ च्या शासन निर्णयामधील आरक्षणविषयक तरतुदी लिपिक-टंकलेखक संवर्गातील पदोन्नतीच्या वाट्याला येणाऱ्या २५ टक्के पदांना लागू करून त्यानुसार होणारी आरक्षित पदे विचारात घेऊन पदोन्नत्या देण्यात याव्यात.

४) संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि. १५/४/१९९१ च्या आदेशातील अर्हताप्राप्त उमेदवारांची परस्पर ज्येष्ठता राखणे, टंकलेखनाची विहित वेगमर्यादा प्राप्त करणे इत्यादी अटी यापुढे देखील तशाच कायम राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्रकाश लोखंडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
* प्रबंधक, मूळ न्यायशाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
* प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई (पत्राने),
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधानसभा), मुंबई, (पत्राने),
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधानपरिषद), मुंबई, (पत्राने),
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई, (पत्राने),
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभगप्रमुख व कार्यालयप्रमुख
निवड नस्ती.

* पत्राने.